**पोलीस अधीक्षक, जालना यांच्या आस्थापनेवरील पोलीस ठाणे, गोंदी येथील पुर्वीच्या सहायक पोलीस निरिक्षक या पदांऐवजी पोलिस निरिक्षक हे पद, तर पोलीस ठाणे, सेवली येथील पुर्वीचे पोलीस निरिक्षक या पदांऐवजी सहायक पोलीस निरिक्षक हे पद आप-आपसात स्थानांतरणाने उपलब्ध करून देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एपीओ-२५२१/प्र.क्र.८३/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २८ मार्च,२०२३.

<u>वाचा :-</u>

१) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/पोठा गोंदी-श्रेणीवाढ-जालना/१५०/२०२१, दि.२७.०८.२०२१ व दि.०८.०४.२०२२.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५.

<u>प्रस्तावना :-</u>

पोलीस अधीक्षक, जालना यांचे आस्थापनेवरील पोलीस ठाणे, गोंदी येथे सध्या सहायक पोलीस निरिक्षक या दर्जाचे, तर पोलीस ठाणे, सेवली येथे पोलीस निरिक्षक या दर्जाचे पद मंजूर आहे.

२. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक २७.०८.२०२१ व दि.०८.०४.२०२२ च्या पत्रांव्दारे पोलीस ठाणे, गोंदी येथील सहायक पोलीस निरीक्षक हे पद श्रेणीवाढ (Upgrade) करुन पोलीस निरीक्षक दर्जाचे, तर पोलीस ठाणे, सेवली येथील पोलीस निरीक्षक दर्जाचे पद पदावनत (Downgrade) करुन सहायक पोलीस निरीक्षक दर्जाचे करण्याबाबत विनंती केली.

३. तथापि, प्रस्तुत प्रकरणी दर्जा उन्नत/ पदानवत करणेकरीता उच्च स्तरीय सचिव समितीसमोर प्रस्ताव सादर करणे आवश्यक होते. **त्याऐवजी** पोलीस अधीक्षक,जालना यांचे अधिपत्याखालील

उक्त पोलीस ठाणेच्या प्रभारी अधिकारी यांचे दर्जा उन्नत/पदानवत न करता,पोलीस ठाणे,गोंदी येथील पुर्वीच्या सहायक पोलीस निरिक्षक या पदांऐवजी पोलिस निरिक्षक हे पद, तर पोलीस ठाणे, सेवली येथील पुर्वीचे पोलीस निरिक्षक या पदांऐवजी सहायक पोलीस निरिक्षक हे पद आप-आपसात **स्थानांतरणाने** उपलब्ध करून देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

पोलीस अधीक्षक,जालना यांचे अधिपत्याखालील पोलीस ठाणे,गोंदी येथे पुर्वीच्या "सहायक पोलीस निरिक्षक" या पदांऐवजी "पोलिस निरिक्षक" दर्जाचे पद,तर पोलीस ठाणे, सेवली येथे पुर्वीचे "पोलीस निरिक्षक" या पदांऐवजी "सहायक पोलीस निरिक्षक" या दर्जाचे पद आप-आपसांत स्थानांतरणाने उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त प्रकरणी पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांनी योग्य ती कार्यवाही करून, अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ व्दारे विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१८५४३१९३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2023.03.28 18:58:19 +05'30'

**( रुपाली कबरे )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२.मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३.मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४.अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६.प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७.अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे.
८.पोलीस अधीक्षक,जालना.
९.अधिदान व लेखा अधिकारी,जालना.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,जालना
१२.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१.
१३.निवड नस्ती, पोल-३.